“उच्चदाब वितरण प्रणाली” योजनेअंतर्गत दि.३१.०३.२०१८ अखेर वीज जोडणी करिता प्रलंबित असणाऱ्या विदर्भ व मराठवाडा विभागातील सर्वसाधारण प्रवर्गातील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता सन २०२१-२२ मध्ये अनुदान वितरण (के-६, मुख्य लेखाशिर्ष-२८०१५५१६)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निधिवि-२०२२/उविप्र/प्र.क्र.१३/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२२.

वाचा:- १. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र: संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४५/ ऊर्जा-५ /दि. ३१.१०.२०१७
२. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र: उविप्र-२०१८/प्र.क्र. ३०/ऊर्जा-५ / दि.०५.०५.२०१८
३. शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.
४. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र: उविप्र-२०१८/प्र.क्र. ३०/ऊर्जा-५ /दि.१५.०९.२०२१
५. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र:संकीर्ण-२०१९/प्र.क्र.७७/ ऊर्जा-३, दि.११.१२.२०१९
६. महावितरण कंपनी पत्र क्र. मु.अ/उविप्र/पुरवणी मागणी/२६२५८/दि.२५.१०.२०२१
७. शासन निर्णय क्रमांक: निधिवि-२०२२/उविप्र/प्र.क्र.१३/ऊर्जा-५/दि.१६.०३.२०२२

प्रस्तावना :-

राज्यातील दि.३१.०३..२०१८ अखेर पैसे भरुन वीज जोडणी करिता प्रलंबित असलेल्या सुमारे २.२४ लाख कृषीपंपांना उच्च दाब वितरण प्रणालीद्वारे वीज जोडणी देण्याकरिता शासन निर्णय दि.०५.०५.२०१८ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या रु.५०४८.१३ कोटी इतक्या प्रकल्प खर्चास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेअंतर्गत विदर्भ व मराठवाडा विभागातील प्रलंबित कृषीपंपांना वीज जोडण्या देण्याकरिता रु.२२४८.०९ कोटी इतका निधी अनुदान स्वरुपात महावितरण कंपनीस वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. उर्वरित महाराष्ट्रातील प्रलंबित कृषीपंप अर्जदारांसाठी वीज जोडणी देण्याकरिता येणारा खर्च रु.२८०० कोटी महावितरण कंपनी बँकांकडून कर्ज घेऊन उभारणार आहे. विदर्भ व मराठवाडा विभागातील सर्वसाधारण प्रवर्गातील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता रु.१८८५.५० कोटी इतका निधी अनुदान स्वरुपात देण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यापैकी रु.१४७१.६३ कोटी निधी महावितरण कंपनीस वितरित करण्यात आले आहेत. त्याचप्रमाणे या विभागातील अनुसुचित जाती प्रवर्गातील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडण्या देण्याकरिता रु.३०३.१६ कोटी तसेच अनुसुचित जमाती प्रवर्गातील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता रु.५९.४३ कोटी महावितरण कंपनीस वितरित करण्यात आले आहेत.

२. तद्नंतर दि.१५.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये उच्चदाब वितरण प्रणाली योजनेस सुधारित मान्यता देण्यात आली. सुधारित मान्यतेनुसार विदर्भ व मराठवाडा विभागातील सर्वसाधारण प्रवर्गातील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिताचे अनुदान रु.१८८५.५० कोटी वरुन रु.२६६६.२३ कोटी इतके वाढविण्यास मान्यता देण्यात आली आहे. परंतु उर्वरित महाराष्ट्रातील प्रलंबित कृषीपंप अर्जदारांची संख्या कमी झाल्याने प्रकल्पाची सुधारित किंमत रु.५०४८.१३ कोटी वरुन रु.४७३४.६१ कोटी इतकी झाली आहे.

३. सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता विदर्भ व मराठवाडा विभागातील प्रलंबित कृषीपंपांना वीज जोडणी देण्याकरिता लेखाशिर्ष क्र.२८०१५५१६ अंतर्गत रु.११०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे.

४. विदर्भ व मराठवाडा विभागाकरिता सुधारित मान्यतेनुसार ८२,०५२ इतक्या कृषीपंपांना उच्चदाब वितरण प्रणालीद्वारे वीज जोडण्या देण्याचे नियोजित आहे. त्यापैकी दि.२८.०२.२०२२ अखेर ७०,८४३ इतक्या कृषीपंपांना वीज जोडण्या देण्यात आल्या आहेत. तसेच ४० उपकेंद्रे कार्यान्वित करण्यात आली आहेत, याकरिता महावितरण कंपनीस सुमारे रु.१९८३.६० कोटी इतका खर्च आला आहे. यापैकी रु.१४७१.६३ कोटी आतापर्यंत वितरित करण्यात आले आहेत व भौतिक प्रगतीनुसार रु.५११.९७ कोटी इतक्या खर्चाची प्रतीपुर्ती करणे अद्याप बाकी आहे. या करिता सद्यस्थितीत उपलब्ध असलेली रु.५११.९७ कोटी इतकी तरतूद रोख स्वरुपात महावितरण कंपनी वितरित करावयाची आवश्यकता आहे. त्याअनुषंगाने सन २०२१-२२ या वर्षाकरिता लेखाशिर्ष क्र.२८०१५५१६ अंतर्गत मंजूर असणारी तरतूद रु.७०० कोटी तसेच पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेली रक्कम रु.४०० कोटी असे एकूण रु.११०० कोटी महावितरणला सुधारित तरतूद मंजूर करण्यात आलेले आहेत. त्यापैकी महावितरणला शा.नि.संदर्भ क्र.७ नुसार रु.४२० कोटी इतका निधी रोखीने वितरीत करण्यात आलेला आहे. त्यापैकी उर्वरित निधी रु.२८० कोटी इतका निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

(१) "उच्चदाब वितरण प्रणाली" योजनेअंतर्गत दि.३१.०३.२०१८ अखेर वीज जोडणी करिता प्रलंबित असणाऱ्या विदर्भ व मराठवाडा विभागातील सर्वसाधारण प्रवर्गातील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता रु.२८०,००,००,०००/- (रुपये दोनशे ऐंशी कोटी फक्त) इतका निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(२) या निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली अनुदानाची रक्कम फक्त दि.३१.०३.२०१८ अखेर प्रलंबित असणाऱ्या कृषीपंप वीजजोडणी देण्याकरिता आवश्यक पायाभूत सुविधा उभारणे कामी खर्च होईल याची दक्षता विभाग स्तरावर ऊर्जा-५ ने तसेच महावितरण कंपनीने घ्यावी. तसेच ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहिल.

(३) सदर खर्च मागणी क्र.के-६ खाली, १९९ अशासकीय संस्थांना सहाय्य, (००)(०२) विदर्भ व मराठवाडा विभागातील कृषीपंपांना वीज जोडणी देणे (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) लेखाशिर्ष क्र.२८०१५५१६ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

(४) सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.ना.रा.ढाणे, अवर सचिव (ऊर्जा-३) व श्री.ना.श्री.कराड, नियंत्रण अधिकारी म्हणून उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रु.२८०,००,००,०००/- (रुपये दोनशे ऐंशी कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

(५) या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.२४.०६.२०२१ च्या परिशिष्टातील तपासणी अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

(६) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११८/२०२२/व्यय-१६, दि.२९.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमती नुसार व मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

(७) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३२९१७०६३४८०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2022.04.04 16:54:36 +05'30'

**(प्र.पु.बडगेरी)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई-३२.
६. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
७. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
९. अपर मुख्य सचिव (नियोजन ) मंत्रालय, मुंबई-३२.
१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१२. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१३. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई- ००५.
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१५. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१८. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९. अवर सचिव, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२०. कक्ष अधिकारी (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई-३२
२१. कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२२. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.